कोल्हापूर शहर एकात्मिक रस्ते विकास प्रकल्पांतर्गत आकारण्यात येत असलेल्या पथकराऐवजी अन्य पर्याय शोधण्यासाठी समितीचे गठन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
शासन निर्णय क्र.खाक्षेस-२०१५/प्र.क्र.१७/रस्ते-८
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- २२.०१.२०१५

**प्रस्तावना :-**

कोल्हापूर शहर एकात्मिक रस्ते विकास प्रकल्प राबविण्याचा निर्णय नगर विकास विभागाने दिनांक २४.०१.२००८ च्या शासन निर्णयान्वये घेतला असून सदर प्रकल्प नगर विकास विभागामार्फत महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडून राबविण्यात येत आहे. सदर प्रकल्पावरील पथकर वसुली बंद करण्याबाबत स्थानिक नागरिकांकडून, तसेच लोकप्रतिनिधींकडून वारंवार मागणी व आंदोलने होत असून त्याबाबत सदरील पथकरनाके बंद करुन काही पर्यायी उपाययोजना करता येईल किंवा कसे, ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २४.१२.२०१४ रोजी मंत्रीमंडळ सभागृह, नागपूर येथे झालेल्या बैठकीमध्ये याबाबत सविस्तर चर्चा होऊन समिती गठीत करण्याचा निर्णय घेण्यात आला.

**शासन निर्णय :-**

कोल्हापूर शहर रस्ते विकास प्रकल्पांतर्गत आकारल्या जाणाऱ्या पथकरासंदर्भात पथकराऐवजी पर्याय शोधण्यासाठी समितीची स्थापना खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नांव व पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम). | अध्यक्ष |
| २ | मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून). | सदस्य |
| ३ | मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण. | सदस्य |
| ४ | सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग. | सदस्य |
| ५ | उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ. | सदस्य |
| ६ | आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका. | सदस्य |
| ७ | सचिव (नवि-२), नगर विकास विभाग. | सदस्य |
| ८ | उपसचिव, नगर विकास विभाग. | सदस्य सचिव |

सदर समितीच्या बैठकांचे आयोजन नगर विकास विभागाने करावे. सदर समितीने अभ्यास करुन एक महिन्याच्या आत अहवाल सादर करणे अपेक्षित आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०१२३१७०२१०९११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sanjay Shriram Solanki

Digitally signed by Sanjay Shriram Solanki
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Shriram Solanki
Date: 2015.01.23 17:10:40 +05'30'

**( सं. श्री. सोलंकी )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे खाजगी सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
३. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव,
४. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम यांचे खाजगी सचिव,
५. मा. मंत्री, अन्न व नागरी पुरवठा यांचे खाजगी सचिव,
६. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव,
७. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम यांचे खाजगी सचिव,
८. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
९. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई- ३२,
१०.अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,
११.सचिव (नवि-२), नगर विकास विभाग,
१२.सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग,
१३.सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग,
१४.उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ (मर्या.), मुंबई-३६,
१५.विभागीय आयुक्त, पुणे,
१६.आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका, कोल्हापूर,
१७.जिल्हाधिकारी, कोल्हापूर,
१८. उपसचिव, नगर विकास विभाग,
१९.कार्यासन अधिकारी, सारसंग्रह कार्यासन (लेखापरिक्षा), सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०.निवड नस्ती (२ प्रती).